किमान आधारभूत किंमत योजना राबविण्यासाठी नाफेडमार्फत खरेदी केलेल्या मालाचे चुकारे शेतकऱ्यांना अदा करण्याकरिता येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१४/प्र.क्र.१९०/२४ स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१५

**संदर्भ :-** १)शासन निर्णय, वित्त विभाग क्र.शाहमी-२०१४/सपववि/प्र.क्र.२६/अर्थबळ, दिनांक ८ ऑगस्ट, २०१४
२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपस-२०१४/प्र.क्र.१६४/ २४ स, दिनांक २० ऑक्टोबर, २०१४
३) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपस-२०१४/प्र.क्र.१६४/ २४ स, दिनांक १५ नोव्हेंबर, २०१४
४) परिपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. पूरक-२०१४/प्र.क्र.१५२/१७-स, दिनांक ५ जानेवारी, २०१५
५) प्रभारी सरव्यवस्थापक (पणन), दि महाराष्ट्र स्टेट को- ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई यांचे पत्र जा.नं अन्नधान्य/ नाफेड-खरेदी/हमीशुल्क/२०१४-१५/२५९१, दि. १९.१.२०१५

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने नाफेड या संस्थेची सन २०१३-१४ मध्ये आधारभूत दराने विविध कडधान्ये, तृणधान्ये, तेलबिया यांची खरेदी करण्यासाठी प्रमुख अभिकर्ता म्हणून नेमणूक केली आहे. नाफेडने सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यात महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई यांची उपअभिकर्ता म्हणून नियुक्ती केली आहे. नाफेडमार्फत महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाकडून किमान आधारभूत किंमत योजनेअंतर्गत खरेदी होत असलेल्या शेतमालाची रक्कम उशीराने प्राप्त होत असल्याने शेतकऱ्यांचे चुकारे जलदगतीने अदा करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास हंगाम २०१३-१४ करिता राष्ट्रीयकृत बँकेमार्फत रु. ५० कोटी इतके कर्ज घेण्यास सहा महिने कालावधीची शासनहमी देण्यास मंत्रीमंडळाने तत्त्वत: मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने संदर्भ क्र. १ येथील वित्त विभागाच्या दिनांक ८ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयान्वये शासन हमी मंजूर करण्यात आली आहे व संदर्भ क्र. २ येथील दि. २० ऑक्टोबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास हंगाम २०१३-१४ करिता राष्ट्रीयकृत बँकेमार्फत रु. ५० कोटी इतके कर्ज

घेण्यास कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास नाफेडमार्फत खरेदी केलेल्या शेतमालाची रक्कम अदा करण्याकरिता येणाऱ्या अनुषंगीक खर्चासाठी अर्थसहाय्य" या योजनेतर योजनेस संदर्भ क्र. ३ येथील दि. १५ नोव्हेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत योजनेकरिता सन २०१४-१५ या वित्तिय वर्षात पुरवणी मागणीद्वारे रु. ३३,३३,३३३/- इतक्या रकमेची तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाने सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

हंगाम २०१३-१४ करिता किमान आधारभूत किंमत योजना राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास नाफेडमार्फत खरेदी केलेल्या शेतमालाची रक्कम अदा करण्याकरिता येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेला रु.३३,३३,३३३/- (रुपये तेहतीस लाख तेहतीस हजार तीनशे तेहतीस फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे

२. सदर खर्च सन २०१४-२०१५ च्या खालील लेखाशीर्षाखाली पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

"मागणी क्र. व्ही-२, मुख्यलेखाशिर्ष २४२५, सहकार, (००)(१०८), इतर सहकारी संस्थांना सहाय्य, (०१) पणन सहकारी संस्था, (०१)(२२) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास नाफेडमार्फत खरेदी केलेल्या शेतमालाची रक्कम अदा करण्याकरिता येणाऱ्या अनुषंगीक खर्चासाठी अर्थसहाय्य (योजनेतर) (२४२५ २४१७) ३३, अर्थसहाय्य".

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी वापर करुन संबंधित फेडरेशनने त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल विनाविलंब शासनास सादर करावा.

४. या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या रु. ३३,३३,३३३/- (रुपये तेहतीस लाख तेहतीस हजार तीनशे तेहतीस फक्त) चा धनादेश The Maharashtra State Co-operative Marketing Federation Ltd., Mumbai यांच्या नावे काढण्यात यावा.

५. या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता श्रीमती अ. अ. चुरी, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री.रा.स.अटक, उपसचिव (पणन), सहकार,

पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं १२५/१५/व्यय २, दिनांक १०.३.२०१५ अन्वये त्यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३१११४९३६४७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saguna Ganesh Thengil

Digitally signed by Saguna Ganesh Thengil
DN: CN = Saguna Ganesh Thengil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.03.31 11:59:39 +05'30'

**( सगुणा ठेंगील)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई,
२. अपर मुख्यसचिव (कृषी व पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मस्जीद, मुंबई-९,
४. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, पुणे
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१०. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई,
११. वित्त विभाग, (व्यय-२, अर्थसंकल्प-३ व १३), मंत्रालय, मुंबई,
१२. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (३ प्रती),
१५. कक्ष अधिकारी, १७ स/संगणक कक्ष, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१६. निवडनस्ती.